**आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकाच्या प्रमाणपत्राचा (EWS) लाभ पात्र उमेदवारांना मिळणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक राआधो ४०१९/प्र.क्र.३१/१६-अ**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक - २८ जुलै, २०२०

<u>वाचा</u> -:१ .शासन निर्णय क्रमांक राआधो ४०१९/प्र.क्र.३१/१६-अ, दि. १२ फेब्रुवारी, २०२०
२. शासन पत्र क्र. राआधो ४०१९/प्र.क्र.३१/१६-अ, दि. २० मार्च, २०१९
३. शासन पत्र क्र. राआधो ४०१९/प्र.क्र.३१/१६-अ, दि. २६ एप्रिल, २०१९
४. शासन पत्र क्र. राआधो ४०१९/प्र.क्र.३१/१६-अ, दि. ६ सप्टेंबर, २०१९

**<u>प्रस्तावना -:</u>**

सामान्य प्रशासन विभागाने दि. १२ फेब्रुवारी २०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये खुल्या प्रवर्गातील आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकांसाठी शासकीय सेवा व शैक्षणिक संस्थांमध्ये प्रवेशाकरिता १० % जागा आरक्षित केल्या आहेत. सदर शासन निर्णयामध्ये आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकासाठीचे पात्रता प्रमाणपत्र देण्यासाठी सक्षम अधिकारी म्हणून तहसिलदार यांना घोषित करण्यात आले आहे. त्यानंतर दि. २० मार्च २०१९ च्या पत्रान्वये केंद्र शासनामधील नागरी सेवा व पदे यामध्ये सरळसेवा प्रवेशासाठी आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकासाठी विहित करण्यात आलेल्या आरक्षणाचा लाभ घेण्याकरिता उत्पन्न व मत्ता यांचे प्रमाणपत्र देण्याबाबत सर्व विभागीय आयुक्त / जिल्हाधिकारी / सर्व निवासी उपजिल्हाधिकारी / सर्व तालुका दंडाधिकारी तथा तहसिलदार यांना आवश्यक सूचना दिल्या आहेत. तसेच दि. २६ एप्रिल, २०१९ रोजीच्या पत्रान्वये केंद्र शासनामधील नागरी सेवा व पदे यामध्ये सरळसेवा प्रवेशासाठी आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकाच्या आरक्षणासाठी मराठा समाज पात्र असल्यामुळे, मराठा समाजातील पात्रताधारकांना विहित नमुन्यातील उत्पन्नाचे प्रमाणपत्र देण्याच्या सूचना देण्यात आल्या आहेत. त्यानंतर दि. ६ सप्टेंबर २०१९ रोजीच्या पत्रान्वये केंद्र शासनामधील नागरी सेवा व पदे यामध्ये सरळसेवा प्रवेशासाठी आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकासाठी विहित करण्यात आलेल्या आरक्षणाचा लाभ घेण्याकरिता उत्पन्न व मत्ता यांचे प्रमाणपत्र देण्याबाबतच्या सूचना संबंधीतांना दिल्या आहेत. तलाठी भरती प्रक्रिया- २०१९ राज्यातील विविध जिल्हा निवड समित्यांमार्फत सुरू असून राज्यात सामाजिक आरक्षण प्रवर्गातील अनेक उमेदवार, आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकांच्या प्रमाणपत्राचा लाभ घेत असल्याबाबत तक्रारी या विभागास प्राप्त झालेल्या आहेत. सदर तक्रारींच्या अनुषंगाने प्रमाणपत्र

निर्गमित करणाऱ्या सक्षम प्राधिकाऱ्यांना तसेच नियुक्ती प्राधिकाऱ्यांना आवश्यक सूचना निर्गमित करणे आवश्यक आहे.

**शासन परिपत्रक -:**

आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटक म्हणजे ज्या घटकांना कोणत्याही मागास प्रवर्गातील आरक्षणाचा लाभ किंवा सोयीसुविधेचा फायदा दिला जात नाही, अशा खुल्या प्रवर्गातील आर्थिकदृष्ट्या कमकुवत घटकांचा यात समावेश आहे. केंद्र शासनाच्या मागास प्रवर्गाच्या यादीमध्ये मराठा समाजाचा समावेश नाही. त्यामुळे केंद्र शासनामधील नागरी सेवा व पदे यामध्ये सरळसेवा प्रवेशासाठी आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकाच्या आरक्षणासाठी मराठा समाज पात्र आहे. राज्यात मराठा समाजाला सामाजिक आणि शैक्षणिक मागास (SEBC) या प्रवर्गातून आरक्षण देण्यात आलेले आहे. त्यामुळे मराठा समाजाला आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकांसाठीच्या १० टक्के आरक्षणाचा लाभ राज्यातील शासकीय सेवा व शैक्षणिक संस्थांतील प्रवेशाच्या जागा यामध्ये घेता येणार नाही.

२. राज्यातील आरक्षित प्रवर्गातील अनेक उमेदवारांना आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकांचे प्रमाणपत्र दिल्याच्या तक्रारी प्राप्त झाल्या आहेत. यास्तव आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकांचे प्रमाणपत्र एखाद्या उमेदवाराला देण्यापूर्वी, सदर उमेदवार राज्यात लागू असलेल्या सामाजिक आरक्षणात मोडतो किंवा कसे याबाबत संबंधित तहसिलदारांनी खात्री करावी. तसेच नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी देखील आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकांतील उमेदवारांची कागदपत्रे पडताळणी करते वेळी संबंधित उमेदवार सामाजिक आरक्षणात मोडतो किंवा कसे याबाबत कागदपत्रांवरून तपासणी करावी, जेणेकरून पात्र उमेदवारांना आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकांच्या प्रमाणपत्राचा लाभ घेता येईल.

३. केंद्रीय सेवांचा लाभ घेण्यासाठीचे आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकांचे प्रमाणपत्र, राज्य शासकीय सेवांसाठीच्या पदभरतीमध्ये वापरले जाणार नाही याची देखील दक्षता संबंधीत नियुक्ती प्राधिकारी यांनी घ्यावी. आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकांचे प्रमाणपत्राचा राज्य शासनाचा नमुना व केंद्र शासनाचा नमुना यात फरक आहे. राज्य शासकीय सेवा व शैक्षणिक संस्थांच्या प्रवेशाकरिता राज्य शासनाचा नमुना वापरणे आवश्यक आहे. **(सोबत राज्य व केंद्र शासनाचे नमुने जोडले आहेत).**

प्रस्तुत शासन परिपत्रक सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी आपल्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुख यांच्या निदर्शनास आणावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक २०२००७२८१६१७२१८५०७ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

Vitthal Dattaram Phansekar

Digitally signed by Vitthal Dattaram Phansekar
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=GAD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=aa921b4f67d94448f966795a63ffea53bcaa1efd9dca1e5b52fdbbd21c6450d3, cn=Vitthal Dattaram Phansekar
Date: 2020.07.28 16:22:48 +05'30'

(वि. द. फणसेकर)
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. शासनाचे सर्व अप्पर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई
प्रस्तुत परिपत्रक आपल्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख / कार्यालय प्रमुखांच्या निदर्शनास आणावे.

२. सर्व विभागीय आयुक्त / जिल्हाधिकारी / सर्व निवासी उपजिल्हाधिकारी / सर्व तालुका दंडाधिकारी तथा तहसिलदार

३. निवड नस्ती/कार्यासन १६-अ.